**विभागीय उपआयुक्त व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, नागपूर या दोन्ही कार्यालयांच्या अधीनस्त कार्यालयासाठी कार्यालयीन इमारतीच्या बांधकामाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बीजीटी-१००८/प्र.क्र.५८/इएक्ससी-४,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १९ ऑक्टोबर, २०१८.

वाचा:-

१) गृह विभाग, शासन निर्णय क्र. बीजीटी-१००८/प्र.क्र.५८/इएक्ससी-४, दि.०७.०१.२०११.
२) शासन परिपत्रक, नियोजन विभाग क्र.ससमा २०१०/प्र.क्र.४८/का.१४६१, दि.३०.१.२०१२.
३) मा. मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखलील सचिव समितीची दि.२३०७.२०१४ रोजीची बैठक.
४) उप आयुक्त (प्र.), राउशु यांचे पत्र क्र. बिएलडी २०१६/वार्षिक योजना/२०१७-१८/१६/सहा, दि.२५.०७.२०१८.

**शासन निर्णय**:-

राज्य उत्पादन शुल्क विभागाच्या कॉटन मार्केट वेअर हाउस, नागपूर येथील जागेवर विभागीय उप आयुक्त व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, नागपूर या दोन्ही कार्यालयांच्या अधीनस्त कार्यालयासाठी कार्यालयीन इमारतीच्या बांधकामाबाबत रू.६,३५,२३,६८२/- (एकूण सहा कोटी पस्तीस लक्ष तेवीस हजार सहाशे ब्याऐंशी फक्त) इतक्या खर्चाच्या प्रस्तावास संदर्भाधीन दि.०७.०१.२०११ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदरहू प्रस्ताव नियोजन विभागाच्या संदर्भाधीन शासन परिपत्रकान्वये, सचिव समितीसमोर सादर केला असता समितीने सदर कामाच्या रु. ५९५.५२ लक्ष एवढया किमतीस प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दर्शविली होती.

सदर बांधकामासाठी आतापर्यंत रु. ५,०८,८७,०००/- इतका खर्च झालेला असून या प्रकरणी मार्च २०१९ पर्यंत स्थापत्य कामास रु. ८२.०० लक्ष आणि विद्युतीकरण कामास रु. २९.०४ लक्ष असे एकूण रु. १११.०४ लक्ष अतिरिक्त निधी आवश्यक असल्याचे उप आयुक्त (प्र.), राउशु यांनी संदर्भाधीन दि.२५.०७.२०१८ च्या पत्रान्वये कळविले आहे. सदर बांधकामासाठी रु.६,१९,९१,०००/- इतका खर्च अंतिमत: अपेक्षित आहे.

त्याअनुषंगाने विभागीय उपआयुक्त व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, नागपूर या दोन्ही कार्यालयांच्या अधीनस्त कार्यालयासाठी कार्यालयीन इमारतीच्या बांधकामाच्या प्रशासकीय मान्यतेबाबत संदर्भाधीन दि.०७.०१.२०११ च्या शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आलेल्या रू. ६,३५,२३,६८२ च्या खर्चामध्ये सुधारणा करून उक्त कामासाठी रू.६,१९,९१,०००/- इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

सदर खर्च मागणी क्र. एच-८ मुख्य लेखाशिर्ष "४०५९- सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च, (१५) दारूबंदी व राज्य उत्पादन शुल्क, (१५) (०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम) (४०५९ १०३३)- ५३ मोठी बांधकामे या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

सदरचा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाच्या अनौ. संदर्भ क्र.४३०/१८/इमा-२, दि.०९.१०.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१८१०१९१४४४४७३१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shivaji Baburao Chavan

Digitally signed by Shivaji Baburao Chavan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9aa522e32450ec03b47343bc963097b0e134f043fb205f2e97595f145aaf4d73, serialNumber=b5ccfce8750c2a4b31ad76a42c0094dcbcc63834c3279619496c6858859c8594, cn=Shivaji Baburao Chavan
Date: 2018.10.19 14:48:02 +05'30'

**( शिवाजी बा.चव्हाण )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मंत्री, राज्य उत्पादन शुल्क यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. महालेखापाल- महाराष्ट्र १, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
३. महालेखापाल- महाराष्ट्र २, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
४. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. सार्वजनिक बांधकाम विभाग, इमारती-२/अर्थ-२, मंत्रालय, मुंबई
६. नियोजन विभाग, का.१४६१, मंत्रालय, मुंबई
७. अवर सचिव, गृह विभाग/अर्थ-२, मंत्रालय, मुंबई
८. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर.
९. कार्यकारी अभियंता, जागतिक बँक प्रकल्प विभाग, नागपूर.
१०. निवडनस्ती-राउशु १.